शासकीय कर्मचा-यांना त्यांच्या मासिक देय
वेतन व भत्त्यांचे प्रदान कार्यपध्दतीत सुधारणा
करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : डी.डी.ओ.१०००/प्र.क्र.१६१/कोषा-प्र-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ ऑगस्ट २००१.

सुधारित वेतन प्रदान पध्दतीबाबत पुढीलप्रमाणे अतिरिक्त सुचना सर्व संबंधितांना देण्यात येत आहेत :

१. वेतन प्रदानास कोणत्याही प्रकारे विलंब होऊ नये यासाठी वेतन देयक विहित दिनांकाला अधिदान व लेखा कार्यालयात सादर करणे व अधिदान व लेखा कार्यालयाने देयक पारित केल्यानंतर त्याचा धनादेश कार्यालयाने वेळेत नेणे या दोनही कृतींचे काटेकोर पालन आजही ब-याच आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून केले जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर बाब या विभागाने संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना उचित सुचना देण्यासाठी व आवश्यक वाटल्यास अशा अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांना अशा अधिकाऱ्यांच्या यादीसह पाठविलेली आहे. भविष्यात आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी वेतन प्रदानाचे वेळापत्रक काटेकोरपणे न पाळल्यामुळे विलंब झाल्याबाबत कर्मचारी किंवा संघटनांची तक्रार आल्यास अशा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर त्यांचे कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख/प्रशासकीय विभाग यांचेकडून उचित कारवाई केली जाईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

२. रेखांकित धनादेश बँकेत सादर झाल्यानंतर सर्वसाधारणपणे तो वटण्यास तीन दिवस एवढा कालावधी आवश्यक असतो. यास्तव वेतन देयकाचे रेखांकित धनादेश अधिदान व लेखा कार्यालयाकडून २५ तारखेपर्यंत निर्गमित होतील.

३. आहरण व संवितरण अधिका-यांनी बँकेकडे धनादेशासह कर्मचा-यांच्या तपशीलाची यादी पाठवितांना सोबत पाठवावयाच्या पत्रावर स्वत: स्वाक्षरी करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

क. कि.पारकर
शासनाच्या अवर सचिव

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील बृहन्मुंबईतील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र,मुंबई,